मराठी पुस्तके

# मामा परमानंद यांस पत्र

## महात्मा जोतिबा फुले

**12/27/2013**

टंकन: हर्षला रामाणे

मुद्रितशोधन : आशा दादुडे

## मामा परमानंद यांस पत्र

१८७९ साली श्री. शंकर तुकाराम शाळीग्राम यांनी "थोर पुरुषांचे आणि स्त्रियांचे पोवाडे" हा पोवाड्यांचा संग्रह प्रसिद्ध केला. एच. ए. ऍकवर्थ हे इतिहास प्रेमी आय.सी.एस. अधिकारी याच वर्षी मुंबईच्या सचिवालयात महसूल खात्याचे अवर सचिव म्हणून काम करीत होते. त्यांच्याच खात्यात जोतीरांवाचे स्नेही नारायण महादेव उर्फ परमानंद अधीक्षम मामा म्हणून काम करीत होते. मराठ्यांच्या पराक्रमाचा इतिहास सांगणारे पोवाडे गोंधळ्यांना मुखोदगत होते. त्यांच्याकडून ते ऐकून व उतरवून घेऊन पोवाड्यांचे संकलन व प्रकाशन करण्याचे काम शंकरराव शाळिग्रामांचा कित्ता गिरवून त्यांच्या सहकार्याने करण्याचा ऍकवर्थसाहेबाने निर्धार केला. १८८६ पासून या कामास सुरुवात करून त्याने शंकरराव शाळिग्रामांचे सहकार्य मिळवून १८९१ साली "इतिहास प्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे," हा संग्रह प्रसिद्ध केला. पोवाड्यांच्या संकलनाच्या या कामात ऍकवर्थला मामा परमानंद मदत करीत असत. जोतीरावांच्या संग्रहात असे पोवाडे असण्याची शक्यता लक्षात घेऊन मामा परमानंदांनी ३० मे, १८८६ रोजी जोतीरावांना एक पत्र पाठवले होते. त्याला जोतीरावांनी पाठवलेले उत्तर पुढे छापले आहे.

# मामा परमानंद यांस पत्र

मुक्काम पुणें त ॥ २ माहे जून १८८६ ई ॥

राजमान्य राजेश्री नारायणराव माधवराव परमानंद मु ॥ आंबेर

साष्टांग नमस्कार वि. वि. आपलें त ॥ ३० माहे गुदस्तचे कृपापत्र पावलें. त्याचप्रे॥ पुण्याचे हायस्कुलांतील भागवतमास्तर यानीं शंकर तुकाराम यानीं छापलेलें पवाड्याचे पुस्तकांतील काहीं शाहीरांची एक याद मजला आणून दिली, यावरून मी त्यास एक वेळीं कळविलें कीं, सदरचे पवाड्याची प्रत मजजवळ नाहीं आणि ती पाहिल्याशिवाय मला याविषयीं काहीं कळवितां येत नाहीं. नंतर त्यांनीं तें पुस्तक मला आणून देण्याचें कबूल केलें. परंतु त्यांनीं कबूल केल्याप्रे॥ पवाड्याचें पुस्तक आणून दिलें नाहीं. सबब त्याविषयीं मला काही आपल्यास लिहून कळवितां आलें नाहीं.

फितुरी गोपीनाथपंताचे साह्यानें शिवाजीनें दगा करून अफझुलखानाचा [वध ?] केला. तान्हाजी मालुसऱ्यानें घोरपडीचे साह्यानें सिंहगड किल्ला काबीज केला व शिवाजीनें पुण्यांत दरोडा घालून मुसलमान लोकांस कापून काढलें या सर्वांच्या कच्च्या हकीकतीचे खरे पवाडे माझे पहाण्यांत आले नाहींत. आज दिनपावेतों युरोपियन लोकांनीं जे काही इतिहास तयार केले आहेत, ते सर्व शुद्रा आणि अतिशूद्रांची वास्तविक स्थिति ताडून न पहातां +++ झांकून आर्य भटब्राह्मणांचे ग्रंथावर व भटकामगारांचे सांगण्यावर भरंवसा ठेवून इतिहास तयार केले आहेत. व अलीकडे भटब्राह्मणांचीं विद्वान पोरेंसोरें नवीन पवाडे करून हळूच मैदानांत आणीत आहेत. त्यापैकीं माझे पहाण्यांतही बरेच आले आहेत आणि त्यांतील शूद्रांनीं कमविलेल्या मोत्यापोंवळ्यांचा चारा चरणारे भागवती, गोब्राह्मणासह दादोजी कोंडदेवास फाजील आगांतुकी करावयास लावल्यामुळें तसल्या बनावट पवाड्यांचा मी संचय केला नाहीं.

आठ वर्षांपूर्वी जेव्हां मी मुंबईत आपले घरीं भेटावयास आलों होतों, तेव्हां पाचगणीचे पाटील रामपासमक्ष आपल्यास शुद्र शेतकऱ्याचे दैण्यवाण्या स्थितीचा काही देखावा जगापुढें आणणार, म्हणून कबूल केलें होतें. तें त्या देखाव्याचें असूड या नावाचें तीन वर्षांपूर्वी येक पुस्तक तयार केलें व त्याची येकेक प्रत आपले कलकत्त्याचे हरभास व अष्टपैलू गवरनर जनरल [साहेब व ?] श्रीमान महाराज बडोद्याचे गायकवाड सुरकारास पाठविल्या आहेत. आमच्या शुद्रांत

भेकडबाहुले छापखानेवाले असल्यामुळें ते पुस्तक छापून काढण्याचें काम तूर्त येके बाजूला ठेविलें आहे. असूडाची प्रत आपल्यास पहाण्याकरिता पाहिजे असल्यास त्याप्रमाणें लिहून आल्याबरोबर त्याची नकल करण्यास लेखक बसवितो. नकल होण्यास सुमारें एकदोन महिने लागतील असा अदमास आहे. कळावें लोभ असावा ही विनंती.

आपला

**जोतीराव गोविंदराव फुले**

**—समाप्त—**